**शासकीय तंत्रनिकेतने व औषधनिर्माणशास्त्र संस्थांमधील सेवा नियमित करण्यात आलेल्या अधिव्याख्यात्यांना मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार निवृत्तीवेतनादी लाभ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- न्यायाप्र-२०१०/प्र.क्र.११०/२०१०(ब)/तांशि -७**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १८ सप्टेंबर, २०१५.

**पहा :** १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक :- न्यायाप्र २०१०/प्र.क्र.११०/२०१०(ब) /तांशि -७, दि. १४/१/२०१५.
२) मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर यांचे दि. १९/१०/२०१३ चे आदेश.
३) मा. सर्वोच्च न्यायालय, यांचे दि. ११/९/२०१५ चे आदेश.
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक:- अंनियो-१००५/१२६/प्र.क्र. ३२/सेवा-४, दि.३१/१०/२००५ व दि. ०६/०४/२०१५.

**पार्श्वभूमी :-**

मा. उच्च न्यायालयाच्या संदर्भ क्र. २ येथील दि.१९/१०/२०१३ च्या आदेशान्वये शासकीय तंत्रनिकेतने व औषधनिर्माणशास्त्र संस्थांमधील कंत्राटी तत्वावर नियुक्ती केलेल्या अधिव्याख्यात्यांच्या सेवा नियमित करण्याबाबत दिलेल्या आदेशास अनुसरुन मा. सर्वोच्च न्यायालयात शासनाने विशेष अनुमती याचिका क्र. ३९०१४/२०१३ अन्वये दाखल केली होती. तथापि, सर्वोच्च न्यायालयाने दि. ०६/०१/२०१५ रोजी दिलेल्या आदेशानुसार सदर विषेश अनुमती याचिका फ़ेटाळल्याने शासनाने मंत्रीमंडळाच्या मान्यतेनुसार संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये शासकीय तंत्रनिकेतने व औषधनिर्माणशास्त्र संस्थांमधील कंत्राटी / हंगामी तत्वावरील अधिव्याख्यात्यांच्या सेवा नियमित करून त्यांना नविन राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजना लागू केली होती.

या संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या अवमान याचिका क्र. ५३१/२०१४ मध्ये दि. ११/०९/२०१५ रोजीच्या सुनावणीदरम्यान मा. सर्वोच्च न्यायालयाने नोंदविलेल्या निरीक्षणानुसार, संदर्भ क्र. १ अन्वये सेवा नियमित केलेल्या हंगामी / कंत्राटी अधिव्याख्यात्यांना त्यांच्या सेवा ज्या दिनांकापासून नियमित करण्यात आल्या त्या प्रथम नियुक्तीच्या वेळी अस्तित्वात असलेले महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ अंतर्गत निवृत्ती वेतन योजना लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वरील संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये शासकीय तंत्रनिकेतने व औषधनिर्माणशास्त्र संस्थांमधील अध्यापकांच्या सेवा त्यांच्या मूळ नियुक्तीच्या दिनांकापासून नियमित केल्या आहेत. यापैकी जे अध्यापक हे दि. ३१/१०/२००५ व त्यापूर्वी नियुक्त झाले आहेत त्यांना त्यावेळी अस्तित्वात असलेली महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ अंतर्गत लागू असलेली निवृत्ती वेतन योजना लागू राहील.

२. तथापि उर्वरित अध्यापक हे दि. ०१/११/२००५ किंवा त्यानंतर शासन सेवेत नियुक्त झाले असल्यामुळे अन्य शासकीय अधिकारी व कर्मचारी यांचेकरीता शासनाने वित्त विभागाच्या वरील संदर्भ क्र. ०४ अन्वये लागू केलेली नविन राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजना सदरहू अध्यापकांनादेखील अनुज्ञेय राहील.

३. सदर अध्यापकांच्या सेवा मा. न्यायालयाच्या खालील आदेशानुसार त्यांच्या मूळ नियुक्तीच्या दिनांकापासून नियमित केल्या आहेत.

"The respondents are directed to regularize the services of such of the petitioners and confer permanency on such petitioners who have completed three years' service with technical breaks. The respondents shall absorb the petitioners within a period of six weeks. Needless to state that the petitioners who are in continuous employment till 15.10.2013 shall be continued in service as regular employees.

However, in the facts and circumstances of the case, we direct that the petitioners shall be entitled to regular salary from 1st November, 2013 and would not be entitled to claim any monetary benefits for the past services rendered by them in spite of their regularization. Needless to state that since the petitioners' services are regularized, they shall be entitled to the continuity in service for all other purposes except monetary purposes from the date of their first appointment."

४. यानुसार ज्या दिनांकापासून त्यांच्या सेवा नियमित स्वरुपात करण्यात आल्या आहेत, म्हणजेच त्यांच्या नियुक्तीच्या प्रथम दिनांकापासूनच्या सेवेसाठीचे आर्थिक लाभांव्यतिरीक्त (Monetary purposes) सर्व सेवाविषयक लाभांसाठी त्या सेवा ग्राह्य धरण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ११०/सेवा-४, दि. १४/०९/२०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१८१७१२३१०३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kiran Ashok Jadhav

Digitally signed by Kiran Ashok Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=520f8fcee847f1c0c636dc41dd071c509eb7d5ce1c25c32732dfea00eba9b134, cn=Kiran Ashok Jadhav
Date: 2015.09.18 17:19:53 +05'30'

**( किरण जाधव )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मंत्री (उच्च व तंत्रशिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव,
४) अपर मुख्य सचिव, (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, हुतात्मा चौक, मुंबई, (पत्राद्वारे)
८) प्रधान सचिव (उ.व तं. शि. वि.) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई
९) सर्व सह सचिव/उपसचिव उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय मुंबई
१०) संचालक,तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११) सहसंचालक, तंत्रशिक्षण सर्व विभागीय कार्यालये,
१२) सर्व प्राचार्य, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालये.
१३) सर्व प्राचार्य, शासकीय तंत्र निकेतने
१४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१५) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१८) निवड नस्ती /तांशि-७ /तांशि-१